# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.११२/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २८ जुलै २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस लाईन, कुलाबा, मुंबई, येथील इमारतीच्या गच्चीवर पाण्याची टाकी ठेवण्यासाठी चबुतरा (platform) तयार करणे, "टेरेस वॉटरप्रुफींग" करणे, इत्यादी कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-८(०१)/शा.१६०/१७, दिनांक ०५.०६.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, पोलीस लाईन, कुलाबा, मुंबई, येथील इमारतीच्या गच्चीवर पाण्याची टाकी ठेवण्यासाठी चबुतरा (platform) तयार करणे, "टेरेस वॉटरप्रुफींग" करणे, इत्यादी कामे करण्याचा प्रशासकीय मान्यता चा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-अभियंता, दक्षिण (सार्वजनिक बांधकाम) उप-विभाग, मुंबई, यांनी सन २०१४-१५ च्या जिल्हा दरसूचीनुसार तयार केलेले रु.३५,५१,६४६/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सार्वजनिक बांधकाम) विभाग, मुंबई, यांनी सांक्षाकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते पुढील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे सुधारले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे :-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| १. | पोलीस लाईन, कुलाबा, मुंबई, येथील इमारतीच्या गच्चीवर पाण्याची टाकी ठेवण्यासाठी चबुतरा (platform) तयार करणे. | रु.२७,२९,१०९/- |
| २. | कुलाबा पोलीस ठाणे याचा आवारातील इमारतीच्या गच्चीवर गळतीरोधक उपाययोजना करणे. | रु.११,५५,१३३/- |
| **एकूण** | | **रु. ३८,८४,२४२/-** |

४. परिच्छेद ३ मधील तक्त्यात विनिर्दिष्ट केल्यानुसार पोलीस लाईन, कुलाबा, मुंबई, येथील इमारतीच्या गच्चीवर पाण्याची टाकी ठेवण्यासाठी चबुतरा (platform) तयार करणे, "टेरेस वॉटरप्रुफींग" करणे, इत्यादी कामे करण्याकरिता **रु.३८,८४,२४२/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५६६/इमा-२, दिनांक १०.०७.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२९१०३९१८२३२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.07.29 10:45:51 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सार्वजनिक बांधकाम) विभाग, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).